|| हरि ॐ ||

|| ॐ मन:सामर्थ्यदाता श्रीअनिरुद्धाय नम: ||

# महाशिवरात्र

१) शिवतत्त्व म्हणजे काय?

महाविष्णू म्हणजेच परमशिव, ॐकार आणि प्रणवही. पूर्ण शुद्ध व पूर्ण पावित्र्य म्हणजे शिव. शिव म्हणजे मांगल्य. शिवाचा कर्पूरगौर वर्ण ह्याच पावित्र्याचा व शुद्धतेचा निदर्शक आहे. म्हणूनच मूळ 'शिवा'मध्ये कितीही अपवित्र येऊन मिळालं तरी ते संपूर्ण 'शिव'च तयार होते.

आम्ही जन्मापासून कितीही चुका, पापे केलेली असतील, आधीच्या जन्मात पापे केली असतील तरी ज्याक्षणी आम्ही शिवाच्या गंगेमध्ये सामील होतो त्याक्षणी आमच्या जीवनाची गंगा होते. अशुद्धतेला पिऊन त्याचे जो शुद्धतेत रूपांतर करतो. तोच शिव.

२) शिवलिंगाचे सर्वोच्च प्रतिक कोणतं?

वाळूपासून बनविलेलं शिवलिंग अर्थात 'वाळूकेश्वर' हे शिवतत्त्वाचं सर्वोच्च प्रतीक आहे.

३) महाशिवरात्रीचे महात्म्य काय?

प्रत्येक महिन्यात शिवरात्री येते. मात्र माघ महिन्यात (माघ कृ त्रयोदशीच्या रात्री) येणाऱ्या महाशिवरात्रीला विशेष महत्त्व आहे. त्या महाशिवरात्रीचा महिमा थोडक्यात बघूया.

मार्कण्डेय ऋषि शिवतत्त्वाबद्दल चिंतन करीत असताना त्यांना शिवाच्या खऱ्या कार्याचं ज्ञान झालं. त्याचवेळी त्यांच्यासमोर शिवाचे अर्धनारीनटेशश्वर असे रूप प्रथमच प्रकट झाले. त्याच रात्री ह्या रूपाचे प्रथम पूजन मार्कण्डेय ऋषिंनी केलं तर पूजनाला अगस्ती ऋषि पुरोहित होते. हिच ती रात्र 'महाशिवरात्र' म्हणून भक्तमानसात स्थिर झाली व शिवपूजनाकरीता सर्वश्रेष्ठ म्हणून मान्यता पावली.

४) अर्धनारीनटेश्वर ह्या रूपामागे काय तत्त्व आहे?

अर्धनारीनटेश्वर रूप म्हणजे शिव आणि पार्वती यांचे एकत्रित रूप. अर्धनारी

नटेश्वर पुरुषतत्त्वाचं व स्थितत्त्वाचे अशी दोन्ही कार्य करू शकतो. पॉझिटिव्ह व निगेटिव्ह (उष्ण व शीत)अशा दोन्ही तत्त्वांना एकाच वेळेस नियंत्रणात ठेवण्याचं सामर्थ्य ह्या परमशिवाचे आहे. हे एकत्रित सामर्थ्य दर्शविणारे रूप म्हणजे अर्धनारीनटेश्वर.

५) महाशिवरात्री म्हणजे कोणती रात्र? आपल्या भारत देशात हा उत्सव कसा साजरा केला जातो?

संपूर्ण भारतवर्षात परंपरेने माघ कृष्ण त्रयोदशीची रात्र ही महाशिवरात्र मानली जाते. माझ्या मनातील मत्सराचा नाश करून पावित्र्याचा उदय घडवून आणणारा हा उत्सव. भारतात जी बारा ज्योर्तिलिंगे आहेत त्या प्रत्येक ठिकाणी भगवान शिवाचा महाशिवरात्री महोत्सव साजरा केला जातो. ह्या दिवशी सर्वत्र भगवान शिवाच्या मूर्तिची किंवा शिवलिंगाची बेल वाहून पूजा केली जाते. शिवलिंगावर दुधाचा अभिषेक केला जातो. अशा रितीने शिवलिंगाचे मनोभावे पूजन केले असता शिवभक्तांना शिवाची विशेष कृपा प्राप्त होते.

ह्या दिवशी आपल्या परंपरेप्रमाणे उपवास केला जातो. व शिवमंदिरात जाऊन शिवाचे दर्शन घेतले जाते. ॐ नमः शिवाय, शिवपंचाक्षरी स्तोत्र (ॐ नागेंद्रहाराय) तसेच शिवलिलामृत ग्रंथाचे पठण केले जाते. शिवाला शरण जाऊन बिल्वपत्रे अर्पण केली जातात व दुधाचा अभिषेकही करतात.

६) शिवपंचाक्षरी स्तोत्र कोणते? शिवपंचाक्षरी स्तोत्राचे महात्म काय? ते कोणी विरचित केले?

आराधनाज्योति पुस्तकात क्र. ६२ पृष्ठ क्रमांक ३२२ वर हे स्तोत्र अर्थासहीत दिलेले आहे. ते स्तोत्र म्हणजे "ॐ नागेंद्रहाराय त्रिलोचनाय भस्माङ्गरागाय महेश्वराय। नित्याय शुद्धाय दिगम्बराय तस्मै 'न' काराय नमः शिवाय।" शिवाच्या चिंतनातून मार्कण्डेय ऋषिंना जे ज्ञान झालं ते त्यांनी शिवाचा श्रेष्ठ भक्त नंदि ऋषि यांना दिलं. त्यानंतर त्यांनी हे स्तोत्र विरचित केले आहे. त्यांनी शिवाला प्रसन्न करून घेण्यासाठी, शिवाचं वाहन बनण्यासाठी ज्या मंत्राने तपश्चर्या केली त्या तपश्चर्येचा हा मंत्र आहे.

ह्या स्तोत्रातील प्रत्येक कडवे 'नमः शिवाय' ह्या शिवपंचाक्षरी मंत्रातील एकेक अक्षराने सुरू होते. हे स्तोत्र शिवाचे अप्रतिम गुणत्व, रुपवर्णन व गुणसंकीर्तन करणारे आहे.

हे शिवपंचाक्षर स्तोत्र म्हणजे 'ॐ नमः शिवाय' ह्या मंत्राची सर्व ताकद व रहस्य

ह्यात प्रगट करण्यात आलेले आहे. ती ताकद प्राप्त व्हावी म्हणून ह्या स्तोत्राची रचना न म शि वा य ह्या अक्षरांनी केली आहे. त्याचा आपल्याला अर्थ कळो वा न कळो, जो भावाने, श्रद्धेने म्हणणार आहे. त्याला 'ॐ नम: शिवाय' ह्या जपाचं खरं सामर्थ्य प्राप्त होणार आहे.

७) पंचाक्षरी मंत्र कोणता?

'नम: शिवाय' हा पंचाक्षरी मंत्र. ह्या मंत्राचा कंपन समुदाय नेमकं शिवाप्रमाणे कार्य करतो. हा एकाच क्षणाला प्रकाश आणतो व त्याच क्षणाला हवा तेथे अंधार पण करतो. हा मंत्र इतर कोणत्याही मंत्राच्या सिद्धीसाठी, वापर करण्यासाठी आवश्यक असणारी गुरुकिल्लीच आहे. सलग १११ दिवस दररोज ११११ वेळा ह्या नम: शिवाय मंत्राचा जप केल्याशिवाय कोणताही मंत्र सिद्ध होत नाही. सर्व अशुभतत्त्व काढून टाकणारा हा मंत्र आहे. म्हणूनच नंदिऋषिंनी ह्यातूनच शिवपंचाक्षरी स्तोत्र विरचित केले.

८) नंदि हा शिवाचे वाहन आहे म्हणजे काय?

शिवाचे वाहन बनणे म्हणजे शिवाचे जे गुण आहेत, त्याचे जे कार्य आहे त्याचं संकीर्तन करणे. अर्थात त्याच्या रुपाचे, त्याच्या नामांचे, त्यांच्या गुणाचं व त्याच्या कार्याचं संकीर्तन करणे म्हणजे वाहन बनणे.

९) नंदिपक्ष म्हणजे काय?

महाशिवरात्रीला येणाऱ्या नंदिपक्षामध्ये भगवान शिवाचा श्रेष्ठभक्त नंदि ऋषि यांनी भगवान शिवाचे वाहन बनण्यासाठी त्यांनीच विरचित केलेल्या, शिवपंचाक्षरी स्तोत्राने शिवाची तपश्चर्या केली त्या पंधरवड्याला नंदिपक्ष म्हणतात. अर्थात महाशिवरात्री अगोदरचा एक आठवडा व नंतरचा एक आठवडा मिळून जो पंधरवडा (पक्ष) होतो त्याला नंदिपक्ष असे नाव आहे.

शिवपंचाक्षरी स्तोत्र लिहीणारे प्रातर्नंदि म्हणजेच ऋत ऋषि. प्रात:काळच्या संध्येचा हा दिशादर्शक ऋषि प्रातर्नंदी हा भूतकालातील शिवस्मरण जागृत ठेवणारा आहे.

१०) भगवान शिवाला वाहिल्या जाणाऱ्या बिल्वपत्रामध्ये कोणता भावार्थ आहे?

शिवाला बिल्वपत्र अत्यंत प्रिय असते. पूजनात म्हणूनच बिल्वपत्र अर्पण केले जाते. बेलाच्या पानाला तीन दले असतात. हे बिल्वपत्र म्हणजे 'दोन हात एक माथा' म्हणजेच श्रद्धा, धैर्य (सबुरी) व अनन्यता. दोन हातामधील कार्यशक्ती व माथ्यामधला

भक्ती भाव शिवास अर्पण केल्यास भक्ताला सर्वोच्च पूजन घडते.

१०) वाळुने बनविलेल्या शिवलिंगाचे 'वालुकेश्वर' चे महात्म्य काय? महाशिवरात्रीला श्रद्धावान त्याचं पूजन का करतात?

वाळुने बनविलेले शिवलिंग म्हणजेच अर्धनारीनटेश्वर इथे रूपाची नाही तर गुणांची पूजा अभिप्रेत आहे म्हणून वाळुच्या शिवलिंगाची पूजा करतात. समुद्राच्या लाटा दगडावर आपटून आपटून त्याचा झालेला भुगा म्हणजे वाळु. वर्षानुवर्षे अव्याहतपणे आपटणाऱ्या लाटा पाषाणाची वाळु बनवतात. म्हणून वाळु हे कठोर परिश्रमांच प्रतीक आहे. त्याचप्रमाणे ह्या क्रियेत परस्पर विरोधी गुणधर्मही सुंदररित्या दिसुन येतात.

पाणी - पातळ मऊ व कोमल असे असुनही वाटेतल्या कठोर पाषाणाचा भुगा करते. तर पाषाण अत्यंत कठोर असुनही मऊ पाण्यासमोर स्वत:चा भुगा करून घेतो. म्हणून वाळुपासून बनविलेले शिवलिंग हेच शिवाच्या परस्पर विरोधी सामर्थ्यांच खरं प्रतीक बनल. दोन टोकाचे प्रभाव एकाच शक्तीने साधणे हे शिवाचे खरे कार्य आहे. म्हणूनच महाशिवरात्रीला नंदिपक्षात वालुकेश्वराचे बिल्वपत्र वाहून पूजन करतात.

११) शिवाच्या मुर्तिपेक्षा शिवलिंगाची मंदिरे जास्त का आहेत?

शिवनाम व शिवस्पंदन बुद्धीतून कार्य करतात म्हणून ऋषिंनी मन कुठेही अडकू नये म्हणून शिवलिंगाची आकृती तयार केली. शिवलिंग जरी डोळ्यासमोर दिसलं तरी त्या आकृतिचा मनावर इतर आकृतींसारखा शोभक परिणाम होत नाही, उलट मन शांत होतं म्हणून त्या नामाचा, त्या पूजनाचा जो परिणाम (इफेक्ट) बुद्धीवर व्हायला पाहिजे तो बुद्धीत आपोआप घडून येतो. म्हणून आपल्या देशात शिवलिंगाची मंदिरे जास्त आहेत.

१२) श्रद्धावान महाशिवरात्रीचा उत्सव कसा साजरा करतात?

१) महाशिवरात्रीच्या दिवशी श्री अनिरुद्ध गुरुक्षेत्रम् खार (प.) येथील हरिहर स्वरूप असलेल्या श्री त्रिविक्रमास श्रद्धावान बेल अर्पण करतात व सुगंधीत जलाने अभिषेकही करतात. श्रद्धावानांच्या गर्दीमुळे श्री अनिरुद्ध गुरुक्षेत्रम् रात्री उशिरापर्यंत उघडे ठेवले जाते.

२. महाशिवरात्रीला नंदिपक्षामध्ये (नंदिपंधरवडा) श्री हरिगुरुग्राम वांद्रे पूर्व येथे सदगुरु श्री अनिरुद्धांच्या उपस्थितीत आपल्यामध्ये असलेल्या मत्सराचा नाश व्हावा म्हणून तीन गुरुवारी शिवपंचाक्षरी स्तोत्राची उपासना केली जाते.

३. महाशिवरात्रीला नंदिपक्षामध्ये श्रीहरिगुरुग्राम वांद्रे (पूर्व) येथे तीन गुरुवारी

वालुकेश्वरलिंग ( वाळुने बनविलेले शिवलिंग) दर्शनासाठी ठेवलेले असते. सदगुरु श्री अनिरुद्धांच्या उपस्थितीत श्रद्धावानांना त्यावर तीसऱ्या गुरुवारी बेल अर्पण करता येतो. सदगुरुंच्या उपस्थित श्रद्धावानांना प्राप्त झालेली ही मोठी पर्वणीच होय.

४. येणाऱ्या प्रत्येक महाशिवरात्रीला श्रद्धावानांना श्री अनिरुद्ध गुरुक्षेत्रम् खार (प) येथे श्री महादुर्गेश्वराचे म्हणजेच नर्मदोत्पन्न स्वयंभू नित्यरसेश्वर सदाशिवलिंगाच्या दर्शनाचाही लाभ होणार आहे. ज्या आकारांच हे दिव्यलिंग आहे ते पुर्ण ब्रह्मांडात एकच आहे. त्या श्रीमहादुर्गेश्वराची स्थापना श्री अनिरुद्ध गुरुक्षेत्रम् येथे परमपूज्य श्री अनिरुद्ध परमपूज्य श्री नंदाई व परमपूज्य श्री सुचितदादा यांच्या हस्ते दिनांक १२.१२.२०१२ रोजी ब्रह्ममुहुर्तावर करण्यात आली आहे. श्री महाशिवरात्रीच्या दिवशी श्री अनिरुद्ध गुरुक्षेत्रम् येथे ह्या नित्यरसेश्वर श्री महादुर्गेश्वराचे दर्शन म्हणजे श्रद्धावानांसाठी एक पर्वणीच आहे.

१३) वर्तमान व पुढील काळात महाशिवरात्रीला श्रद्धावान भक्तांसाठी कोणता मुख्य आचार राहणार आहे?

कलीयुगाच्या चरम सीमेवर सदगुरु श्री अनिरुद्धांनी त्यांच्या संकल्पशक्तीद्वारे हरि आणि हरांच एकत्रित रूप (प्रतीक) प्रकटविलेल आहे. तो हरिहर म्हणजेच श्री अनिरुद्ध गुरुक्षेत्रम्मधील त्रिविक्रम. महाशिवरात्रीच्या दिवशी गुरुक्षेत्रममध्ये जाऊन त्रिविक्रमास बिल्वपत्र तसेच सुगंधीत तीर्थजल अर्पण करणे हाच ह्या दिवसाचा मुख्य आचार राहणार आहे.

|| हरि ॐ ||